**दीनदयाळ अंत्योदय योजना सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाकरीता राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान (NULM) अंतर्गत केंद्र हिस्सा वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२१/प्र.क्र.१२१/नवि-२०**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२**
**दिनांक : २३ मार्च, २०२२.**

वाचा : (१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४.०६.२०२१.
(२) नगरपरिषद प्रशानस संचालनालय,क्र.नपप्रसं/२०२१/कक्ष-१०/केंद्र व राज्य हिस्सा / ३३८३, दिनांक ३०.०९.२०२१.

प्रस्तावना :-

केंद्र शासन पुरस्कृत **"सुवर्ण जयंती शहरी रोजगार योजनेची"** पुनर्रचना करुन त्यांचे दीनदयाळ अंत्योदय योजनेतंर्गत **"राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान"** (National Urban Livelihoods Mission) मध्ये रुपांतर करण्यात आले असून राज्यामध्ये सदर अभियानाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. राज्यात सदर अभियान केंद्र-राज्य ६० : ४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत शहरी गरीब कुटूंबातील व्यक्तींना कौशल्य प्रशिक्षण देऊन रोजगारची किंवा स्वंयरोजगाराची संधी उपलब्ध करुन देणे, नागरी बेघरांना निवाऱ्यांची सुविधा उपलब्ध करणे, नागरी भागातील फेरीवाल्यांच्या उपजिविका संबंधी समस्या सोडविणे, शहरी गरीब कुटूंबांच्या राहणीमानाचा दर्जा सुधारुन शहरी दारिद्र्य कमी करणे, इत्यादी उपाययोजना या अभियानांतर्गत राबविण्यात येत असतात. संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, यांनी सदर अभियानासाठी केंद्र-राज्य हिस्सा वितरीत करण्याची विनंती केली आहे.

सन २०२१-२०२२ करीता सदर प्रयोजनासाठी केंद्र हिस्सा म्हणून रु.६४.३६७६ कोटी इतका निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दीनदयाळ अंत्योदय योजनेतंर्गत राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियानांतर्गत कार्यक्रमासाठी वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेली तरतूद केंद्र हिस्सा म्हणून रु. ६४.३६७६ कोटी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाकरीता सह आयुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्याकडे वितरीत करण्यात येत आहे.

**०२.** सदर निधी आहरित करण्यासाठी सहाय्यक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून सह आयुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पुर्व), मुंबई येथे सादर करुन धनादेश प्राप्त करुन घ्यावा.

**०३.** या प्रयोजनासाठी होणारा खर्च नगर विकास विभाग - मागणी क्रमांक एफ-३, २२३०, कामगार व सेवायोजन, ०२, सेवायोजन सेवा, १०१ सेवायोजन सेवा, ०३, नागरी सेवायोजन उपजिविका कार्यक्रम, (०३) (०१) दीनदयाळ अंत्योदय योजना राष्ट्रीय नागरी उपजिविका अभियान (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) (२२३०६०४७), (३१) सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ करीता मंजूर उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**०४.** असे प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२ मधील तरतूदीनुसार व वित्त विभागाने त्यांचे अनौ. संदर्भ क्रमांक ६०/व्यय-३, दिनांक ०७.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२४११३३०६४७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Digitally signed by C Priyanka
Date: 2022.03.31 18:04:37 +05'30'

**(प्रियांका कुलकर्णी-छापवाले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. महालेखापाल (ले. व अ.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/ नागपूर.

९. महालेखापाल (ले. प.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/ नागपूर.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पुर्व), अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
११.निवासी लेखापरीक्षक अधिकारी, मुंबई.
१२.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१३.कार्यासन अर्थसंकल्प -३/कोषा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.कार्यासन अर्थसंकल्प/नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.निवडनस्ती (नवि-२०)